# चैतन्य स्मरण

२०१३



**श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर**

शतसांवत्सरिक पुण्यतिथी महोत्सव

# चैतन्य स्मरण

शतसांवत्सरिक पुण्यतिथी महोत्सव-२०१३

# अनुक्रमणिका

संपादक : श्री. राजाभाऊ मराठे
श्री. रविंद्र पाठक

प्रकाशक: श्री. श्री.ग. दामले
कार्यवाह, श्रीसद्गुरू ब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर
मु.पो. गोंदवले, ता. माण, जि. सातारा पिन : ४१
दूरध्वनी : ०२१६५ - २५८२९२

● पवित्र स्थानाचे दर्शन, पृ.५
● श्रीगोंदवलेकरमहाराज संक्षिप्त चरित्र, पृ.९
● थोडे मागे वळून पाहताना पृ.१३ ● श्रीमहाराज व्यक्तीदर्शन
– श्री. गो.सी गोखले पृ.३५ ● शतसांवत्सरिक महोत्सवाची पूर्वतयारी
– रविंद्र पाठक पृ.४३ ● शंभर वर्ष पूर्ण झाली पृ.५५ ● क्षेत्र गोंदवले
माणगंगा ते नामगंगा, पृ.६० नामसाधना अभ्यास शिबिरे, संकलन : संपादक मंडळ
पृ.९० ● समाधान पाहिजे असेल तर– पू. श्री के वि. बेलसरे, पृ.९३

● श्री महाराजांच्या रत्नहारातील माणिकमोती – ● श्रीआनंदसागरमहाराज – कैलास
गिंदोडिया पृ.१०२ ● श्रीब्रह्मानंदमहाराज – दत्ताण्णा इनामदार पृ.१०५ ● श्रीरामानंदमहाराज –
रामदास आचार्य पृ.११० ● डॉ. श्रीकुर्तकोटी – एन.बी. दीक्षित पृ.११३ ● श्रीप्रह्लादमहाराज –
विनायकराव धानोरकर पृ.११६ ● श्रीभाऊसाहेब केतकर – शालिनीताई गोखले पृ.११९ ●
श्रीतात्यासाहेब केतकर – गो.सी. गोखले पृ.१२३ ● ब्रह्मानंद सांगू किती – रविंद्र पाठक
पृ.१२८ ● पू. बाबा बेलसरे ... – गो.सी. गोखले (पुनर्मुद्रण) पृ.१३७ ● तीर्थरूप बाबा –
श्रीपाद बेलसरे पृ.१४६ ● गोंदवले ऐसे क्षेत्र ... – श्रीपाद जोशी (पुनर्मुद्रण) पृ.१५२ ●
गो. सी. गोखले आमचे बाबा – गोखले परिवार पृ.१५६ ● श्रीमहाराजांची प्रवचने –
आचार्य अत्रे (दै. मराठा अग्रलेख) पृ.१५९ ● श्रीचैतन्य रुग्णालय – संकलन :
डॉ. राजेंद्र वाघमोडे पृ.१६२ ● गोंदवल्याच्या ह्या भूमीत ...– पू. श्री.
बाबा बेलसरे पृ.१७० ● एका साधकाची विचार सुमनं : पृ.१७१

● श्रद्धांजली विभाग, पृ.१७२

संपादन सहाय्य : श्री. आशुतोष केळकर
श्री. शैलेश ढेरे

मुद्रक : के. जोशी आणि कंपनी
१७४५/२ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

स्वागत मूल्य : रु. ८०/-

हजारो भक्तमंडळी श्रीक्षेत्र गोंदवल्यास येतात. येथील वातावरणाने आकर्षिली जातात. श्रीमहाराज त्यांना नामस्मरण करण्याची प्रेरणा व शक्ती देतात. श्रीमहाराज म्हणजे अनंत दु:खी व कष्टी जीवांचे उद्धारकर्ते आहेत. या भवसागरातून जर तरून जावयाचे असेल तर 'नाम' हे एक सोपे साधन आहे, असे त्यांचे सांगणे आहे.





१) सन १९४९, चिंतामणी श्रीराममंदिर प्रतिष्ठापनाप्रसंगी पू. तात्यासाहेब केतकर, पू. बाबा बेलसरे आणि भक्तगण
२) सन १९५५, समाधीमंदिरासमोर पू. तात्यासाहेब केतकर, प्रह्लाद महाराज, पंच श्रीजगन्नाथपंत आठवले व श्रीगोपाळस्वामी आणि भक्तगण
३) सन १९६० च्या दशकातील समाधीमंदिरासमोरील 'श्रीं'चा पालखी सोहळा
४) 'श्रीं'च्या पेटीसमवेत पू. तात्यासाहेब केतकर आणि श्री. गणपतराव दामले

अन्नदान ही गोंदवल्याची संस्कृती आहे आणि रामनाम हा गोंदवल्याचा धर्म आहे. या दोन गोष्टी येथील स्थानाचे सामर्थ्य दाखवितात. ही संस्कृती आणि धर्म ज्या घरात पाळला जातो ते गोंदवले. या असंख्य भक्तमंडळींची घरे, ज्यामध्ये धर्म व संस्कृती जोपासली जाते ती घरे म्हणजे 'गोंदवले'च आहे.





१) सन १९५५, पू. श्री तात्यासाहेब केतकर (दाराजवळ मध्ये बसलेले), पू.श्री बाबा बेलसरे (मुलाला घेऊन मध्ये बसलेले) व श्रींचे इतर भक्तगण
२) मुंबई हाऊस, इथे उतरायला मिळणे म्हणजे भाग्य वाटे.
३) पू.श्री तात्यासाहेब केतकर स्वामीमंदिरात पूजा करताना.
४) पू. तात्यासाहेब केतकर 'श्रीं'च्या पेटीसमवेत.

गोंदवले येथील श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचे समाधिमंदिर अनुगृहितांना आणि भक्तांना आपल्या आजोळसारखेच वाटते. माहेराला पारख्या झालेल्या भगिनींना तर हे प्रत्यक्ष माहेरच वाटते. आमचे सद्गुरू आमचे कोडकौतुक करतात, भक्तिप्रेमात रंगवून टाकतात.










---

१) सौ. घाणेकर आणि सौ. गाडगीळवहिनी काकड्याचे वेळी लोणी नैवेद्य दाखविताना
२) मंदिरप्रदक्षिणा करताना पादुकांचे औक्षण करण्यासाठी भगिनीमंडळ सज्ज
३) देवसुवासिनी औक्षणाच्या तयारीत
४) १९९० च्या दशकातील श्रींची आरती
५) श्री. अण्णासाहेब गाडगीळ व श्री. बापूसाहेब दामले सेवेकऱ्यांशी चर्चा करताना.

श्रीमहाराजांना अन्नदान प्रिय होते. संस्थानच्या पंचमंडळींनी व सेवाभावी भक्तांनी मुक्त अन्नदानाचे व्रत आजपर्यंत अव्याहत चालू ठेवले आहे. भोजनातील साधे पदार्थ, आपल्या आजोळ-माहेरच्या जेवणाप्रमाणेच नेहमी रूचकर लागतात हा सर्वांचा अनुभव आहे.







उत्सव १९९०

१) सकाळचा नाष्टा

२) आईसाहेबमंदिर पटांगण, प्रसाद वाटपाची तयारी

३) कुडकुडणाऱ्या थंडीत चहापानाची तयारी

४) गरमागरम भात तयार झाला

५) उत्सव २००४ - पत्रावळीची मौजच न्यारी

गोंदवले संस्थानचा गेल्या शतकाचा इतिहास म्हणजे
श्रीमहाराजांच्या संकल्पनांचा पुढे आलेला अनुबोधपट



# क्षेत्र गोंदवले
## माणगंगा ते नामगंगा



*श्रीमहाराज समाधिस्थ होऊन एक शतकाचा कालावधी उलटत आहे. त्यांनी घालून दिलेल्या व्यवस्थापनाची कार्यवाही व त्यासाठी जाणते अभ्यासू नामप्रेमी कार्यकर्ते नेमू उपासनेत कदापी खंड पडू नये याची दक्षता घेऊन शके १८३५ अर्थात सन १९१३ ला महासमाधी घेतली. पुढील पानावरती हा अव्याहत वाहत असलेला नामगंगे प्रवाह व त्यासाठी सदैव कार्यरत असलेल्या विश्वस्त तसेच कार्यकर्त्यांचा ओझरता परिच*

### पहिली ७५ वर्षे
### कालखंड १९१३ ते १९८८.

**(१) श्रींच्या समाधीची स्थापना :** शंभर वर्षांपूर्वी, मार्गशीर्ष वद्य दशमी शके १८३५ यादिवशी, श्रीमहाराजांनी भौतिक देहाचा त्याग केला. सध्या समाधीचे आवार म्हणून जे दिसते त्या ठिकाणी त्या काळी श्रींची गोशाळा व गायींची देखभाल करणारे 'गायमास्तर' अभ्यंकर यांची राहण्याची झोपडी, या दोन कच्च्या वास्तू आणि गायींसाठी लागणाऱ्या गवताच्या गंजी, याशिवाय काहीही नव्हते. देह ठेवण्याच्या आदल्या दिवशी संध्याकाळी तेथे जाऊन आपल्या सर्व गायींच्या पाठीवर आपला मायेचा हात फिरवून, श्रीमहारा म्हणाले, ''मी थोडा वेळ इथे बसतो.'' लगे कोणीतरी पुढे होऊन ती जागा झाडून स्वच्छ केली आणि श्रींसाठी एक खुर्ची मांडली. तीव बसून सर्वांशी बोलण्याच्या ओघात म्हणाले ''ही जागा फार छान आहे. इथे कायमचेच येऊन राहावे असे मला फार वाटते.'' दुसरे दिवशी पहाटे श्रींनी देहत्याग केला. तेव्हा त्यानंतरच्या व्यावहारिक व्यवस्थेचा विचार करता श्रींच्या वरील उद्‌गारांची आठवण होऊन, गोशाळेतल्या त्या विशिष्ट ठिकाणीच देहाचे अंतिम विसर्जन करण्याचा निर्णय घेण्यात आला, आणि श्रींच्या त्याच सूचक शब्दांना

अनुसरून त्या देहाच्या दहनाने पवित्र झालेल्या त्याच जागी समाधी उभारावी असेही ठरले. ती सज्जनगडावरील श्रीसमर्थांच्या समाधीच्या पद्धतीची, म्हणजे तळघरात असावी असेही लवकरच ठरले, आणि त्याप्रमाणे कामास सुरुवात होऊन पहिल्या पुण्यतिथीउत्सवाचे आत गाभारा आणि संगमरवरी सिंहासनही तयार झाले.

याठिकाणी स्थापन करावयाच्या पादुकांसंबंधी विचार करतांना एक मागील घटना श्रीब्रह्मानंद व श्रीमहाभागवत यांच्या लक्षात आली. ती अशी की, इ.स. १९०९ मध्ये श्रीमहाराज कर्नाटकचे दौऱ्यावर असताना ते कुर्तकोटीस गेले होते. त्या आधीच श्रीमहाभागवतांच्या मनात आले होते की आपल्या गुरूंच्या पादुका नित्यपूजेसाठी आपल्या घरात असाव्यात आणि या हेतूने काळ्या पाषाणाच्या घोटीव पादुका व भोवती कुंडलिनीप्रतिक नागाचे वेटोळे आणि त्यावर उभारलेला फणा, अशा स्वरूपाच्या त्यांनी करवून आणलेल्या होत्या. श्रीमहाराजांना आपल्या घरी नेऊन त्या पादुकांवर प्रत्यक्ष उभे करून त्यांची महापूजा केली होती. स्थापनेबाबत मात्र श्री म्हणाले होते की, 'पुढे ते योग्य वेळी होईल' हेही सूचक उद्गारच होते हे ध्यानी घेऊन आता समाधिस्थानी त्या पादुकांची स्थापना करण्याचे ठरले, आणि त्याप्रमाणे पहिल्या पुण्यतिथीउत्सवाच्या पहिल्या दिवशी, मार्गशीर्ष वद्य प्रतिपदा शके १८३६ या दिनी विधीपूर्वक स्थापना झाली.

## (२) पुण्यतिथी महोत्सव

पहिल्या आणि पुढील वर्षी दुसऱ्या उत्सवास श्रीब्रह्मानंद स्वतः उपस्थित राहिले, आणि उत्सवाची तपशीलवार पद्धती त्यांनी घालून दिली. सद्गुरूंना अत्यंत प्रिय असलेल्या



समाधी मंदिर सुमारे १९३२



समाधी मंदिर सुमारे १९५५

गोष्टी दोन : अन्नदान आणि नामस्मरण. स्वाभाविकच, अन्नदानासाठी आवश्यक असणाऱ्या कोठीचे पूजन ही उत्सवातील अगदी प्रारंभिक गोष्ट. याचे पाठोपाठ, दहा दिवसांचे अखंड नामस्मरण आणि नामसंकीर्तन याची सुरुवात. प्रतिपदेचे दिवशी नित्याप्रमाणे काकडा व पंचपदी झाल्यावर कोठीपूजन व अखंड नामस्मरणाचा प्रारंभ अशी प्रथा त्यांनी घालून दिली. नामाचा हा पहारा दशमीचे दिवशी महानैवेद्य होईपर्यंत असतो. श्रीब्रह्मानंदमहाराज यांनी पहिल्या वर्षी स्वतः हजर राहून उत्सवाचा कार्यक्रम कसा असावा, किती दिवस असावा, वगैरे पद्धत घालून दिली. उत्सवानंतर एकादशीस प्रक्षालपूजा, महारुद्र व ललिताचे कीर्तन होऊन द्वादशीला पहाटे धनुर्मासानिमित्त सूर्योदयात श्रींना नैवेद्य होतो. आता इतकी वर्षे होऊन गेली तरी मूळ कार्यक्रम श्रीब्रह्मानंदमहाराज यांनी घालून दिलेल्या पद्धतीनेच आजही चालू आहेत. कालमानाने तपशीलात काही फरक पडला असेल तेवढाच.

उत्सवात प्रथम मिणमिणते कंदील व दिवे असायचे. हे दिवे रोज स्वच्छ पुसणे, तेल-वात पाहणे, हेही एक कामच असायचे. त्यानंतर उत्सवात गॅसच्या पेट्रोमॅक्स बत्त्या वापरण्यास सुरुवात झाली. प्यायचे व स्वयंपाकाचे पाणी विहिरीतून रहाटाने काढून भरावे लागे. नंतर विहिरीला रहाटगाडगे बसवले. ते सारखे

मंडळींची प्रार्थना व्हायची व मगच जेवायला सुरुवात व्हायची. पंगत उठताना 'उपासनेला दृढ चालवावे' हा श्लोक म्हणून मगच पंगत उठायची.

श्रीब्रह्मानंदमहाराज यांनी घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणे उत्सव साजरे होत असत. ती चौकट आजपावेतो अजिबात बदललेली नाही. जुनी मंडळी जाऊन त्या जागी नवी मंडळी येत, परंतु मूळ पायात बदल नाही. भक्तमंडळींच्या उत्कट इच्छाशक्तीने व श्रींचे कृपेने उत्सव आनंदात पार पडत. सुरुवातीस उत्सवाचे स्वरूप लहान होते. परंतु कधी काही कमी पडत नसे. श्रीमहाराज सर्व गरजा पुरवत असत असे म्हणण्यास काही दुमत नाही. १९३० सालचे उत्सवाचे अगोदर एक आश्चर्यकारक घटना घडली. एक इन्शुअर्ड पाकिट आले. त्यात एक रेल्वे रसीद व कोरेगावहून गाडीने माल आणणेस खर्चाकरिता रोख रक्कम रु. १००/- होती. वर्षास व पुण्यतिथी महोत्सवास पुरेल एवढे धान्य, गूळ, किराणासामान आले होते. त्यासोबत एक चिठ्ठी होती. त्यावर 'आशीर्वाद' व खाली 'श्रीराम' अशी सही होती. लगेच कोरेगावहून माल सोडवून घेतला व कोठीत भरणा केला. हा प्रकार सतत बारा वर्षे चालू होता. हे धान्य कोठून पाठवले जाते ह्याची संशोधनप्रिय मंडळी जागरुकतेने चौकशी करू लागली; परंतु दरवर्षी वेगळ्या ठिकाणाहून




समाधी मंदिर सन २०१३

## (४) समाधीमंदिर व इतर इमारती

श्रीब्रह्मानंदमहाराजांच्या देखरेखीखाली, मार्गदर्शनाखाली समाधीमंदिर बांधून घेतले. बहुतेक सर्व काम १९१८ सालपर्यंत पूर्ण झाले होते. श्रीब्रह्मानंदमहाराज यांनी १९१८ साली भाद्रपद अमावस्येस देह ठेवला व श्रीआईसाहेब यांचे त्यानंतर बरोबर एक महिन्याने गोंदवले येथे देहावसान झाले. श्रीआईसाहेब यांची समाधी श्रीमहाराजांचे समाधीमंदिरापासून जवळच उत्तरेचे बाजूस बांधण्यात आली. पुढे सीताबाई दांडेकर यांचे पुढाकाराने १९३५ चे सुमारास त्यावर दगडी मंदिर बांधण्यात आले.

श्रीआईसाहेबांचे देहावसान झाल्यानंतर थोड्याच दिवसांत श्रीमहाराजांचा घोडा बत्ताशा याने श्रींचे समाधीपुढे पटांगणात येऊन प्राण सोडला. त्याच जागी त्याचे स्मारक करण्यात आले आहे.

**गोपालकृष्णमंदिर** : सज्जनगडला ज्याप्रमाणे खाली समाधी व त्यावर राममंदिर आहे. त्याप्रमाणेच गोंदवल्यास योजना करावी असे श्रीब्रह्मानंदमहाराज यांनी ठरविले. गोशाळेचे प्रतीक म्हणून हे गोपालकृष्णमंदिर बांधले आहे. श्रीमहाभागवत यांनी अत्यंत देखणी अशी श्रीगोपालकृष्णमूर्ती करवून घेतली. तिची स्थापना सन १९२० मध्ये बापूसाहेब साठ्ये यांचे हस्ते करण्यात आली. ह्या कामी मल्लाप्पा रोण (हुबळीकर) यांनी पुढाकार घेतला होता. सन १९३५ चे सुमारास श्रीआईसाहेबांचे मंदिर बांधून तयार झाले.

**समाधीमंदिराचे शिखर** : श्री. नारायण कुंदापूर यांचे देखरेखीखाली श्रीगोपालकृष्णाचे मंदिरावर शिखर बांधण्यास सुरुवात झाली. परंतु ते काम पुरे होण्याचे आतच ते गेले. अपूर्ण राहिलेले शिखर १९५२ च्या सुमारास वीज पडून नादुरुस्त झाले. त्यानंतर ते सर्व दुरुस्त करण्यात आले.

**समाधीमंदिर सभामंडप** : समाधीमंदिराचे सभामंडपास भिंती नव्हत्या. त्या नारायण कुंदापूर यांचे पुढाकाराने पूर्ण बांधण्यात आल्या.

## (५) गोरक्षण

श्रीमहाराजांचे गायींवर अतिशय प्रेम होते. ते वारंवार गोशाळेत जाऊन गाईंची व्यवस्था नीट होत आहे ना याची खात्री करून घेत. अभ्यंकर, भगवानराव ह्यांना तीच सेवा दिली होती. त्यानंतर गायींची सेवा विश्वनाथबुवा, बसाप्पा ही मंडळी करत. पाठकमास्तर, गणपतराव जोशी इत्यादी मंडळीही गायींचेकडे लक्ष देत.

श्रींचे निर्वाणानंतर एकदा मोठा दुष्काळ पडला व गोशाळेतील गायींना कडबा नाही अशी अवस्था झाली. वाहतुकीची साधने नसल्यामुळे दुसरीकडून कडबा आणणे शक्य नव्हते. त्यामुळे त्यावेळी हे गायींचे मोठे खिल्लार पुण्यास आणले. तळेगावजवळ तळवडे येथे गणपतराव दामले यांची जमीन होती, त्यातून कडबा-गवत पुण्यास आणत. शिवाय इतरत्र हिंडून कडबा गोळा करीत. शनीच्या पाराचे मागील बाजूस एक बखळ होती तेथे या गायी ठेवल्या होत्या. त्यावेळी वासुदेवराव फडके व गणपतराव दामले यांनीही इतरांचे बरोबर



सन २०१२ पुण्यतिथी उत्सव
'श्रीं'ची समाधीची फुलांची आरास



सन २०१२

- कुर्तकोटी व चिंतामणी भक्तनिवास इमारत
- चिंतामणी भक्तनिवास इमारतीत लावलेल्या लिफ्टचे उद्घाटन

सन २००९

- प्रसाद मंडपातील भक्तांना प्रसाद सेवनाची नूतन व्यवस्था
- मंदिर परिसरात पाण्याने तुडुंब भरलेले बंधारे







'श्रीं'च्या वस्तू संग्रहालयातील 'श्रीं'ची मूर्ती

'श्रीं'च्या जन्मस्थानाजवळील 'श्रीं'चे वस्तूसंग्रहालय

**सन २०१२-१३**

- दुमजली स्वच्छता गृह आणि स्नानगृह व शेजारी मध्यवर्ती वस्तू भांडार इमारत
- अखंडित वीज पुरवठ्यासाठी सुसज्ज जनरेटर सेट





सन २०१३

- गोशाळेजवळील बायोगॅस प्रकल्प
- अन्नपदार्थ, पालापाचोळा, निर्माल्य यांपासून कंपोस्ट खतनिर्मिती

आले आहे. यंदा शतसांवत्सरिक वर्षातील गुरुपौर्णिमा उत्सवात सुमारे ३८,००० भक्तांनी तिथे प्रसादभोजन घेतले.

प्रसादभोजनाची गर्दी दररोजच्या ४००-५०० वरून २००० ते ३००० वर गेली. दर पौर्णिमेला तर २० ते ३८ हजार पान होते. पूर्वीसारखे लोकांना खाली मांडी घालून बसायची सवय राहिली नाही. यासाठी टेबल-बाके आणावीत, स्वच्छतेसाठी व वेळ वाचण्यासाठी सेवेकऱ्यांनी रांगेतून येणाऱ्या भक्तांना ताटे वाढून द्यावीत या पर्यायाचा विचार सुरू झाला. हा काळानुरूप बदल पण तो अपरिहार्य होता. आत श्रींचे मूळ तत्त्व 'अन्नदान' हे अबाधीत होते. पूर्वीचाच वेळेचा वक्तशीरपणा होता. आणि विशेष म्हणजे प्रसाद ग्रहण करणारे भक्त व वाढणारे सेवेकरी दोघांच्या सोयीचा होता यामुळे सर्वांच्या पसंतीला उतरला. आता एकाच वेळी ३,००० पानांसाठी भाजी, आमटी, शिरा शिजेल एवढी भली मोठी १२-१५ पातेली आणली गेली. तेवढ्या मोठ्या तितक्याच चुली बांधल्या गेल्या. भक्तांसाठी ३०० किलो भात अर्ध्या तासात शिजेल असे ५ वाफेवरचे कुकर्स व त्यासाठी २ बॉयलर्स आता आहेत. सगळंच अवाढव्य झाले पण प्रसादाची चव तीच आहे कारण श्रीगुरूंची त्यावर नजर आहे.

हीच गोष्ट भक्तांना उतरण्याच्या सोयीची. २५ वर्षांपूर्वी ६०-७० खोल्या होत्या. आज जवळपास दोनशेच्या वर आहेत. आपल्या सर्वांच्याच घरात सोयी चोर पावलाने आल्यात, स्वाभाविक देवाच्या दारातही आम्ही त्याच्या अपेक्षा करू लागलो. पूर्वी एक मिणमिणता दिवा व झोपण्यासाठी एक सतरंजी एवढे सामान मिळाले तरी अप्रूप वाटे. आता बऱ्याचशा नव्या इमारतीत पुरेपूर प्रकाशाची सोय, पंखे, खोलीला लागूनच स्वतंत्र स्वच्छतागृह व खाटा, गाद्या व उशा दिल्या आहेत. एवढे असले तरी मूळ साधेपण कायम आहे. सोयीचे रूपांतर विलासात होऊ नये याची दक्षता घेतलेली आहे. कुठेही भपका नाही. वातानुकूल सोय नाही आणि मूळ तत्त्व कशाचेच द्रव्य घ्यायचे नाही ते आजही अनुसरले जात आहे.

खुद्द समाधीमंदिरही किती बदलले! पहिल्याच्या दुप्पट विस्तार झाला. स्वच्छता व साधेपणा हे डोळ्यापुढे ठेवून त्याचे नूतनीकरण झाले. सभागृहात भिंतीवर संगमरवरी दगड चढला. समाधीमंदिरावरचे गोपाळकृष्णाचे मंदिर, समाधीमंदिर, तीर्थमंडप संगमरवरी दगड व ग्रॅनाईट यांच्या रंगसंगतीने प्रसन्न वातावरण निर्माण करते आहे. मंदिराचे दरवाजे-खिडक्या कोरीव कामात करून घेतल्याने पावित्र्यात भर टाकते. मंदिराचा कळस तर या सर्व वातावरणाचाच कळस. जवळजवळ ७५ वर्षांपूर्वीचा आता ढासळू लागलेला अपूर्व नक्षीचा कळस जसाच्या तसा प्रमाणबद्ध व उत्तम रंगसंगतीचा बनवून घेणे एक आव्हानच होते. सतत दोन वर्षे अशा कारागिरीचा शोध चालू होता. श्रीगुरूंवर निष्ठा ठेवून त्यांच्याकडील प्रत्येक गोष्ट ही अप्रतिमच असली पाहिजे या प्रेरणेने सेवा केली की योग्य व्यक्ती योग्य वेळी श्रीमहाराज उभी करतात याची ती प्रचितीच होती. सर्व बदलले परंतु

